**ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेला ठराव क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ठामपा-२११४/प्र.क्र.१८६/नवि-२३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :-**

(१) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्र. ठामपा/कार्मिक/आयुक्त-८५९/२९२३, दिनांक १०.०८.२०१७
(२) शासन पत्र सम क्रमांक ०९.१०.२०१७, व दिनांक १६.११.२०१७
(३) उपायुक्त (मुख्यालय), ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्र. ठामपा/कार्मिक/उपआ (मु)/ १७६०/६७४५, दिनांक ०९.०२.२०१८
(४) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक ०५.०५.२०१८
(५) शासन पत्र सम क्रमांक दिनांक ११.०७.२०१८

**प्रस्तावना :** -

ठाणे महानगरपालिकेने सन २००८-०९ या आर्थिक वर्षात मागासवर्ग निधी विनियोग प्रकरणी अधिकारी व अभियंते यांचेकडून घडलेल्या अनियमिततेबाबत झालेल्या विभागीय चौकशीत दोषारोप सिध्द झालेल्या अधिकारी व अभियंते यांचे शिक्षेबाबत आदेश निर्गमित करण्यात आले होते.

उक्त आदेशाविरुध्द संबंधितांनी स्थायी समिती, ठाणे महानगरपालिका यांचेकडे अपिल केले होते. सदर अपिलावर स्थायी समिती क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ ठराव पारीत झालेला आहे. सदर ठराव प्रशासनाने सादर केलेल्या प्रस्तावाच्या विपरीत असल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ अन्वये विखंडीत करण्याबाबत, आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी दिनांक संदर्भाधीन क्र. १ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

०३. दिनांक ०३.०७.१९९२ च्या शासन परिपत्रकानुसार महानगरपालिकेने आपल्या महसूली उत्पन्नातील बांधील निधी वजा जाता राहिलेल्या महसूलाचा ५% भाग राखीव निधी म्हणून काढून तो दुर्बल घटकांच्या म्हणजेच अनुसूचित जाती/जमाती, विमुक्त व भटक्या जमाती यांच्या कल्याणकारी योजनेसाठी खर्च करणे आवश्यक आहे.

त्यानुषंगाने ठाणे महानगरपालिकेने सन २००८-०९ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पात मागासवर्ग निधी लेखाशिर्षकांतर्गत सार्वजनिक बांधकाम विभागाकडील कामासाठी रुपये २३ कोटीची तरतुद प्रभाग समितीमधील मागासवर्ग वस्तीनिहाय लोकसंख्येच्या आधारे उपलब्ध करुन दिलेली होती.

सन २००८-२००९ या आर्थिक वर्षात प्रभाग समिती निहाय मागासवर्गीय लोकसंख्या विचारात घेऊन "मागासवर्ग निधी " वितरीत करीत असताना अनेक प्रकारच्या गंभीर प्रशासकिय व आर्थिक अनियमितता निदर्शनास आल्याने, केलेल्या प्राथमिक चौकशीत काही वस्त्यांमध्ये / प्रभागात निर्धारीत रक्कमेपेक्षा जास्त निधींचे प्रस्ताव मंजूर करण्यात आले असल्याचे तसेच प्रशासकिय स्तरावर संबंधित अभियंत्याकडून परस्पर निर्णय घेण्यात येऊन अशा प्रकारच्या प्रशासकीय व वित्तीय अनियमितता झाल्याचे सकृत दर्शनी दिसून आले.

यास्तव, एकुण ३५ अधिकारी/अभियंते/कर्मचारी यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ चे नियम ८ अन्वये विभागीय चौकशी करण्यात आली. त्यापैकी २३ अधिकारी/अभियंते/कर्मचारी यांचेवर ठेवयात आलेले दोषारोप त्यांचेवर सिध्द झाले व ११ अधिकारी/अभियंते यांचेवर ठेवण्यात आलेले दोषारोप त्यांचेवर सिध्द झालेले नाहीत.

❖ दोषारोप सिध्द झालेले अधिकारी/अभियंते खालीलप्रमाणे आहेत:-

| **अ.क्र.** | **अधिकारी / अभियंता यांचे नांव** | **पदनाम** |
|---|---|---|
| १ | श्री. देवेंद्र नेर | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग |
| २ | श्री. गजानन सोबाळकर | लिपिक, सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ३ | श्री. दत्तात्रय मोहिते | कार्यकारी अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ४ | श्री. प्रशांत पाठक | उप अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ५ | श्री. भुवनेश भोईर | कनिष्ठ अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ६ | श्री. संदीप गायकवाड | कनिष्ठ अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ७ | संतोषकुमार गौड | स्थळ पर्यवेक्षक, रायलादेवी प्रभाग समिती |
| ८ | श्री. रविंद्र खडताळे | कार्यकारी अभियंता,वागळे प्रभाग समिती |
| ९ | श्री. शैलेंद्र चारी | कनिष्ठ अभियंता, वागळे प्रभाग समिती |
| १० | श्री. राजकुमार पवार | कनिष्ठ अभियंता, वागळे प्रभाग समिती |
| ११ | श्री. मनोज काळे | स्थळ पर्यवेक्षक, वागळे प्रभाग समिती |
| १२ | श्री. रामदास शिंदे | कार्यकारी अभियंता, वर्तकनगर प्रभाग समिती |
| १३ | श्री. चारुदत्त सरुळकर | कनिष्ठ अभियंता, वर्तकनगर प्रभाग समिती |
| १४ | श्री. तानाजी माने | उप अभियंता, वर्तकनगर प्रभाग समिती |
| १५ | श्री. जन्मेजय मयेकर | स्थळ पर्यवेक्षक, वर्तकनगर प्रभाग समिती |
| १६ | श्री. नितीन पवार | प्रभारी कार्य. अभियंता, नौपाडा प्रभाग समिती |
| १७ | श्री महेश बहिरम | उप अभियंता, नौपाडा प्रभाग समिती |
| १८ | श्री. धनंजय गोसावी | कार्यकारी अभियंता, मुंब्रा प्रभाग समिती |
| १९ | श्री. अरविंद इताडकर | उप अभियंता, मुंब्रा प्रभाग समिती |
| २० | श्री. अंजूम अहमद | कनिष्ठ अभियंता, मुंब्रा प्रभाग समिती |
| २१ | श्री. रमाकांत ठोंबरे | प्रभारी कार्य. अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |
| २२ | श्री. प्रकाश खडतरे | उप अभियंता माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |
| २३ | श्री. संजय शेटये | उप अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |

वर नमुद २३ अधिकारी/ अभियंते यांचेवर ठेवण्यात आलेले दोषारोप व चौकशीतील निष्कर्षानुसार खालील मुद्यांवर दोषारोप सिध्द झालेले आहेत.

१) काही प्रस्ताव मुख्यालय स्तरावर मागासवर्ग निधीत वळविण्यात आल्याचे नमूद आहे. तथापि, प्रस्तावाच्या मुळ नस्तीचे अवलोकन करता लेखाशीर्षात करण्यात आलेला बदल हा उप अभियंता/ कार्यकारी अभियंता यांचे स्वाक्षरीनेच झाल्याचे दिसून आले आहे. त्यामुळे प्रस्ताव मागासवर्ग उपलब्ध निधीच्या रकमेतून खर्च केले जाणार, याची त्यांना कल्पना होती.

२) प्रभागात स्वतत्र रजिस्टर ठेवलेले नाही व त्यामुळे मागास वर्ग निधीचे अतिरिक्त प्रस्ताव मंजूर झाले.

३) मागासवर्ग निधीमधून प्रस्तावाची शिफारस करताना त्या वस्त्यांसाठी किती रकमेचा मागासवर्ग निधी उपलब्ध आहे. याचा विचारच झाला नाही, हे चौकशीत स्पष्ट झाले आहे.

४) पर्यवेक्षणाची व नियंत्रणाची जबाबदारी प्रत्येक प्रभाग समितीमध्ये कार्यकारी अभियंता व उप अभियंता याची होती.

५) मागासवर्ग निधी व्यपगत होत नाही हे विचारात घेऊन प्रस्ताव सादर करताना सन २००७-०८ या मागील वर्षाचा शिल्लक तरतुदीचा आधार घेऊन सादर केलेले प्रस्ताव हे दोन्ही वर्षीच्या तरतुदीपेक्षा जास्त निधीचे प्रस्ताव सादर झाल्याचे चौकशी अंती स्पष्ट झालेले आहे.

६) मुख्यालयात व्यवस्थापन कक्ष म्हणून खास उघडलेल्या स्पेशल सेलमध्ये श्री. देवेंद्र नेर, उप अभियंता, व श्री. गजानन सोबाळकर, लिपिक (सेवानिवृत्त) यांचेवर जबाबदारी सोपविण्यात आली होती. तसेच रद्द करण्यात आलेल्या मूळ नस्तीमध्ये मागासवर्ग निधीच्या उपलब्ध रकमेपेक्षा जादा रकमेचे प्रस्ताव मंजूर झाले त्या प्रस्तावावर श्री. देवेंद्र नेर, उप अभियंता हे प्रभाग समितीकडून वस्ती निहाय मागासवर्ग निधीची तरतूद विचारात न घेता बजेट खर्ची टाकले. मुख्यालय स्तरावर छाननी व तरतुदीची शहानिशा केली नाही. त्यामुळे अर्थ संकल्पिय तरतूदीवर नियंत्रण राहिले नाही व अनियमितता होण्यास सहाय्य झाले.

प्रकरणी विभागीय चौकशीतील निष्कर्षातील उक्त नमूद बाबी विचारात घेऊन दोषारोप झालेल्या २३ अधिकारी/ अभियंते यांचेवर महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ चे नियम ५ अन्वये खालीलप्रमाणे किरकोळ शिक्षा बजावण्यात आलेल्या आहेत:-

श्री. गजानान सोबाळकर, लिपिक हे सेवानिवृत्त असल्याने त्यांची १०% निवृत्ती वेतन १ वर्षाकरीता रोख्ण्यात आले. श्री. रमाकांत ठोंबरे, कार्यकारी अभियंता हे सेवा निवृत्त झाल्याने त्यांचेवर ६२,४००/- व श्री. भुवनेश भोईर, कनिष्ठ अभियंता यांनी राजीनामा दिल्याने यांचेवरही रु. ४३,९९२/- (इतर संबंधितांना प्रस्तावित असलेल्या शिक्षेच्या अनुषंगाने) इतकी दंडात्मक करण्यात आली. तसेच श्री. संतोषकुमार श्रीलेले, कनिष्ठ अभियंता हे ५ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी विनापरवाना गैरहजर असल्याने त्यांना सेवेतून कमी करण्यात आलेले आहे. श्री. तानाजी माने हे मयत झाल्याने त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी उक्त नमुद नियमाचे नियम १३ (चार ) अन्वये मागे घेण्यात आली.

उर्वरीत अधिकारी/ अभियंते यांना खालीलप्रमाणे शिक्षा बजावण्यात आली आहे. कनिष्ठ अभियंता व स्थळ पर्यवेक्षक यांची एक वार्षिक वेतनवाढ एक वर्षाकरीता रोखण्यात आली आहे.

- उप अभियंता व कार्यकारी अभियंता यांची एक वार्षिक वेतनवाढ कायमस्वरुपी रोखण्यात आलेली आहे.
- श्री. देवेंद्र नेर, उप अभियंता यांची एक वार्षिक वेतनवाढ कायमस्वरुपी रोखण्यात आलेली आहे.
- तसेच खालील नमुद अधिकारी/ अभियंते यांचेविरुध्द विभागीय चौकशीत ठेवण्यात आलेले दोषारोप त्यांचेवर सिध्द झालेले नाहीत.

| अ.क्र. | अधिकारी/अभियंता यांचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. के. डी. लाला | नगर अभियंता |
| २ | श्री. रतन अवसरमोल | उप नगर अभियंता |
| ३ | श्री. सुहास सामंत | उप नगर अभियंता |
| ४ | श्री. जयंत गायकवाड | कनिष्ठ अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ५ | श्री. प्रशांत कलगुटकर | कनिष्ठ अभियंता, रायलादेवी प्रभाग समिती |
| ६ | श्री. प्रशांत भोवड | कनिष्ठ अभियंता, वागळे प्रभाग समिती |
| ७ | श्री. दावलशा सय्यद | कनिष्ठ अभियंता, वर्तकनगर प्रभाग समिती |
| ८ | श्री. कुंदन सुर्यराव | कनिष्ठ अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |
| ९ | श्री. आनंद नांदवडेकर | कनिष्ठ अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |
| १० | श्री. शशिकांत भोईर | कनिष्ठ अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |
| ११ | श्री. प्रविण करडी | कनिष्ठ अभियंता, माजिवडा मानपाडा प्रभाग समिती |

ज्या २३ अधिकारी / अभियंतांना शिक्षा बजाविण्यात आली होती अशा अधिकारी / अभियंताना यांनी सदर शिक्षेविरुध्द संबंधितांनी अपीलीय प्राधिकरण सभापती, स्थायी

समितीकडे अपील दाखल केले. सदर अपीलावर स्थायी समितीने क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ पारीत झालेला ठराव खालीलप्रमाणे आहे:-

"स्थळ पर्यवेक्षक व कनिष्ठ अभियंता यांचे कर्तव्य हे वरिष्ठांच्या सुचनेनुसार कामाची पाहणी करुन त्या अनुषंगाने प्रस्ताव तयार करण्याचे असून त्यानुसार त्यांनी कार्यवाही केल्याचे दिसून येते. तसेच तरतुदीपेक्षा जास्त रकमेचे प्रस्ताव हे नंतर रद्द करण्यात आले आहेत. त्यामुळे महापालिकेचे कोणतेही आर्थिक नुकसान व मागासवर्गीय निधीचा अपव्यय झाला असल्याचे दिसून येत नाही.

तसेच उप अभियंता व कार्यकारी अभियंता यांचे कर्तव्य हे स्थळ पर्यवेक्षक व कनिष्ठ अभियंता यांनी सादर केलेले प्रस्ताव आवश्यक तपासणी करुन व त्यातील लेखाशीर्षिय तरतूद पाहून, भांडवली असल्यास त्यातील तरतूद नोंदीसाठी व पुढील कार्यवाहीसाठी प्रस्ताव मुख्यालयाकडे अग्रेषित करण्याचे असून त्यानुसारच त्यांनी कार्यवाही केली असल्याचे दिसून येते. तसेच मुख्यालयामध्ये तरतूदीपेक्षा जास्त रकमेचे प्रस्ताव नोंदविले गेल्याची बाब लक्षात आल्यानंतर सदरचे प्रस्ताव हे पुढील निर्णयापर्यंत स्थगिती ठेवल्याने उप अभियंता व कार्यकारी अभियंता यांचा महापालिकेच्या निधीचा गैरवापर अथवा अपव्यय करण्याचा उद्देश दिसून येत नाही. तसेच त्यामुळे महापालिकेचे कोणतेही आर्थिक नुकसान झाले नसल्याबाबत संबंधित चौकशी अहवालामध्ये नमूद करण्यात आले आहे.

चौकशी अधिकारी यांनी वस्तीनिहाय तरतुदीस अनुसरून कामाचे प्रस्ताव तयार केले असल्याचे तसेच मागासवर्गीय निधी व्यपगत होत नाही हे विचारात घेऊन मागील २००७-०८ या वर्षात मागासवर्ग निधीची नमुद केलेली शिल्लक रक्कम विचारात घेऊन उपलब्ध निधीपेक्षा जास्त रकमेचे प्रस्ताव सादर केले नसल्याची खात्री करुन त्यानुसार वर नमुद ११ अधिकारी/ अभियंते यांचेवर ठेवण्यात आलेल दोषारोप सिध्द होत नसल्याचा निष्कर्ष काढलेला आहे. त्यानुसार सदर ११ अधिकारी/अभियंते यांना निर्दोष घोषित करण्यात आले.

त्यामुळे प्रशासनाचे उपरोक्त स्थळ पर्यवेक्षक, कनिष्ठ अभियंता व कार्यकारी यांना बजावलेली शिक्षा ही कठोर स्वरूपाची असल्याचे दिसून येते. सबब, प्रकरणी चर्चा व विचार विनिमय करुन १० स्थळ पर्यवेक्षक व कनिष्ठ अभियंता तसेच १०उप अभियंता व कार्यकारी अभियंता यांना महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम नियम क्र. ५६ (४) अन्वये उपरोक्त प्रमाणे बजाविण्यात आलेली शिक्षा रद्द करण्यास ही स्थायी समिती मंजुरी देत आहे."

**०४. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५६ (१) मधील (क) मध्ये आयुक्तास महानगरपालिकेने नेमलेल्या कोणत्याही अधिकाऱ्यावर पोट कलम (२) खंड अ,ब,ड,ई व फ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या शास्तीपैकी कोणतीही शास्ती लादता येईल अशी तरतूद आहे. सदर नियमातील तरतूदीमध्ये निलंबन व वेतनवाढ रोखणे या सारख्या शिक्षेविरुध्द स्थायी समितीसमोर अपील करण्याची तरतूद नाही.**

तद्नुषंगाने आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी स्थायी समिती ठराव क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ अंतर्गत विखंडीत करण्यासाठी शासनाकडे पाठविला आहे.

०५. उपरोक्त वस्तुस्थितीचा विचार करता, सदर प्रकरणी ठाणे महानगरपालिकेचा स्थायी समिती ठराव क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) मधील तरतुदीनुसार दिनांक ०७.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला होता.

तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (२) मधील तरतुदीनुसार उक्त शासन निर्णयात संबधितांनी ३० दिवसाच्या आत अभिवेदन करणे आवश्यक असल्याची बाब नमुद करण्यात आली होती.

तसेच सदर प्रकरणी दिनांक ११.०७.२०१८ च्या पत्रान्वये संबंधिताकडून निवेदन प्राप्त झाले असल्यास ठाणे महानगरपालिकेच्या अभिप्रायासह शासन सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते.

तथापि, सदर प्रकरणी संबंधिताचे अभिवेदन प्राप्त न झाल्याने, ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समिती ठराव क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणे आवश्यक असल्याने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समिती ठराव क्र. १७८९, दि. ३१.०३.२०१६ हा प्रशासनाच्या प्रस्तावानुसार नसल्याने स्थायी समितीने पारित केलेल्या ठरावाप्रमाणे कार्यवाही करणे योग्य नसल्याने तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (१) नुसार निलंबित केलेल्या ठरावासंदर्भात महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (२) नुसार विहीत कालावधीत संबंधितांकडून अभिवेदन / प्रतिवेदन प्राप्त झाले नाही.

यास्तव, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (३) नुसार ठाणे महानगरपालिकेने पारीत केलेला स्थायी समिती ठराव क्र. १७८९, दिनांक ३१.०३.२०१६ अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१०१०१६२३४०८२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2018.10.10 16:26:13 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, ठाणे महानगपालिका, जि. ठाणे
५) उप सचिव (श्री.जाधव), नगर विकास विभाग, यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महापालिका सचिव, ठाणे महानगपालिका
७) निवड नस्ती (नवि-२३) नगर विकास विभाग.